**राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत सोलापूर जिल्हयात सृजन ऑरगॅनिक कमोडिटीज प्रा. लि., सोलापूर या संस्थेस सार्वजनिक, खाजगी भागीदारी तत्वावर शेळीपालन करणे या प्रकल्पास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. राकृवि-२६१९/प्र.क्र.२४ /पदुम-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २५ ऑक्टोबर, २०१९

वाचा :- राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत दि. १८/०७/२०१०९ रोजी पार पडलेल्या २७ व्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

दिनांक १८.०७.२०१९ रोजी राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या पार पडलेल्या २७ व्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या बैठकीमध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत “सृजन ऑरगॅनिक कमोडिटीज प्रा. लि., सोलापूर” या संस्थेच्या सार्वजनिक, खाजगी भागीदारी तत्वावर शेळीपालन करणे या प्रकल्पास मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. त्या अनुषंगाने, खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमीत करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत “सृजन ऑरगॅनिक कमोडिटीज प्रा. लि., सोलापूर” या संस्थेच्या सार्वजनिक, खाजगी भागीदारी तत्वावर शेळीपालन करणे या प्रकल्पास याद्वारे शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. या प्रकल्पासाठी एकूण रु.५२७.९९ लक्ष खर्च अपेक्षित असून, यापैकी राष्ट्रीय कृषि विकास योजनेतून रु.१६३.०० लक्ष निधी मंजूर करण्यात येत आहे. उर्वरित रु.२४०.३४ लक्ष लाभार्थी हिस्सा व रु.१२४.६५ लक्ष सृजन ऑरगॅनिक कमोडिटीज प्रा. लि., सोलापूर या संस्थेचा हिस्सा राहणार आहे. सदरचा प्रकल्प राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत उपलब्ध होणा-या निधीच्या अधीन राहून राबविण्यात यावा.

२. **प्रकल्पाची उद्दिष्टये** :- या प्रकल्पाची उद्दिष्टये खालीलप्रमाणे आहेत.

१. शेतक-यांना आर्थिकदृष्या सक्षम करण्यासाठी अद्ययावत अंशत: ठाणबंद पध्दतीने शेळीपालन करण्यासाठी २० शेळ्या अधिक ०२ बोकड असा शेळी गटाचा पुरवठा करणे व स्वयंरोजगार उपलब्ध करून देणे.
२. शेळयांच्या मांस उत्पादनात गुणात्मक आणि संख्यात्मक वाढ साध्य करणे.

३. शेतक-यांकडील शेळ्यांना स्थानिक बाजारभावापेक्षा जास्त दर मिळण्याच्या दृष्टीने सृजन ऑरगॅनिक कमोडिटीज प्रा. लि., सोलापूर या संस्थेकडून तांत्रिक मार्गदर्शन व विपणन व्यवस्था उपलब्ध करुन देणे.

४. शेतक-यांकडील शेळ्यांना स्थानिक बाजारभावापेक्षा जास्त दर मिळण्याच्या दृष्टीने सृजन ऑरगॅनिक कमोडिटीज प्रा. लि., सोलापूर या संस्थेकडून जिवंत वजनावर आधारीत किंमतीच्या प्रमाणकानुसार शेळयांची खरेदी करणे.

**३. प्रकल्पाचे आर्थिक निकष :-**

सदर प्रकल्पांतर्गत विविध खर्चाच्या बाबी व त्यासाठी अपेक्षित एकूण खर्च याचा तपशिल खालीलप्रमाणे आहेत.

**(रू.लाखात)**

| **अ. क्र.** | **खर्चाची बाब** | **एकुण खर्च** | **राकृवियो हिस्सा** | **लाभार्थी हिस्सा** | **संस्थेचा हिस्सा** |
|---|---|---|---|---|---|
| १ | अशांत ठाणबंद २० शेळी + २ बोकड असा शेळी गट वाटप वाटणे.<br>एका गटाची किंमत **रू. २,२९,४००/-** (25% राकृवियो अनुदान रू. ५७,३५०/- / गट) यामध्ये,<br>अ) एकुण – २०० शेळी गट (२० + २)<br>(१० लाभार्थिंचा १ समुह असे १०० समुह मिळुन १,००० लाभार्थी).<br>एका शेळीची किंमत रू. ६,०००/- व एका बोकडाची किंमत रू. ७,०००/-<br>ब) शेळयांचा निवारा (शेड) -<br>रू. ९५,४००/ युनिट<br>@ रू. २१२/ स्के.फुट. | ४५८.८० | ११४.८१ | २२९.३४ | ११४.६५ |
| २ | बहूवार्षिक वैरण पिकाची लागवड<br>१०० टक्के अनुदानावर रू. १२००/ युनिट (रू.१,२००/- युनिट मध्ये १ एकर क्षेत्रासाठी रू. ४,८००चे बियाणे/ ठोंबे, रू.४,८००/- लागवड/ मशागत, रू.२,४००/- इतर खर्च) | २४.०० | २४.०० | ०० | ०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ३ | कडबा कुट्टी यंत्राचे वाटप ५० टक्के अनुदानावर रू.१६,०००/- प्रति युनिट | ३२.० | १६.०० | ८.०० | ८.०० |
| ४ | मुरघास तयार करण्याचे १ युनिट ५० टक्के अनुदानावर @ रू. १०.० लाख / युनिट<br>मुरघास तयार करण्याची प्रति वर्षी २,००० मे.टन क्षमता असलेले. | १०.०० | ५.०० | ३.०० | २.०० |
| ५ | प्रशासकीय खर्च | ३.१९ | ३.१९ | ०० | ०० |
| | **एकूण** | **५२७.९९** | **१६३.००** | **२४०.३४** | **१२४.६५** |

## ४. प्रकल्पाची अंमलबजावणी आणि संनियंत्रण :-

जिल्हा स्तरावर जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, सोलापूर हे या प्रकल्पाचे अंमलबजावणी अधिकारी राहतील. सदर प्रकल्पाचे संनियंत्रण विभागीय स्तरावर प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, पुणे विभाग, व आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे हे करतील. सदरच्या प्रकल्पास आयुक्त, पशुसंवर्धन, महराष्ट्र राज्य, पुणे यांनी तांत्रिक मंजूरी प्रदान करावी. सदर प्रकल्पाचा कालावधी एक वर्षाकरिता राहील. सदर प्रकल्प राबविण्याकरिता मंजूर करण्यात आलेल्या प्रकल्प अहवालानुसार प्रकल्प विहीत कालावधीत पूर्ण करण्याबाबातचे विहीत नमुन्यातील बंधपत्र व कामाचा आराखडा सृजन ऑरगॅनिक कमोडिटीज प्रा.लि., सोलापूर यांनी जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, सोलापूर यांना सादर करणे बंधनकारक आहे. बंधपत्राचा मसुदा आयुक्त पशुसंवर्धन यांनी तयार करावा. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, सोलापूर यांनी उपरोक्त संस्थेकडून विधीग्राहय बंधपत्र लिहून घ्यावे व ते आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सादर करावे.

## ५. अटी व शर्ती :-

१. मंजूर करण्यात आलेला निधी हा उपरोक्त तक्यात नमूद बाबींसाठी प्रकल्पाच्या सविस्तर प्रकल्प अहवालात समाविष्ट असलेल्या मंजूर घटकांकरिता संस्थेने खर्ची घालावा.
२. मंजूर प्रकल्प किंमतीपेक्षा अधिकचा खर्च संस्था स्वत: सोसेल व वाढीव प्रकल्पावर होणा-या खर्चासाठी शासन जबाबदार राहणार नाही. तसेच शासनामार्फत मंजूर प्रकल्प किंमती व्यतिरिक्त अन्य कोणताही निधी मंजूर करण्यात येणार नाही.
३. मंजूर करण्यात आलेल्या निधीबाबत झालेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे जी.एफ.आर.नियम क्रमांक १४९ अन्वये विहित केलेल्या पध्दतीप्रमाणे संस्थेने ठेवावेत व झालेल्या खर्चाचा अहवाल आणि लेख्यांच्या संदर्भात झालेले लेखापरीक्षण या संबंधीची माहिती आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सादर करण्यात यावी.

४. संस्थेला मंजूर निधीमधून प्राप्त झालेल्या मिळकतीची स्थावर/निमस्थावर अशा सर्व मिळकतीचे लेखे लेखापरिक्षणास आवश्यकतेप्रमाणे उपलब्ध करुन दयावेत.

५. संस्थेला मंजूर करण्यात आलेल्या निधीमधून झालेल्या मिळकतीमधील वाढीची विल्हेवाट लावण्यापूर्वी शासनाची मान्यता घेणे संस्थेस बंधनकारक राहील.

६. संस्थेला उपलब्ध करुन दिलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र संस्थेने आयुक्त पशुसंवर्धन,महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत विहित विवरणपत्रात शासनास सादर करावे.

७. वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाल्याखेरीज उर्वरित निधी वितरीत केला जाणार नाही. तसेच, वितरीत निधी विहित कालावधीत खर्च न केल्यास प्रकल्प कोणत्याही टप्प्यावर रद्द करण्यात येईल.

८. मंजूर प्रकल्पाची यशस्वीरीत्या अंमलबजावणी करण्याची जबाबदारी जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, सोलापूर यांची राहील. तसेच, प्रादेशिक स्तरावर प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, पुणे व राज्यस्तरावर आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे हे संनियंत्रण अधिकारी म्हणून राहतील.

९. सदर प्रकल्प राबविणे सोयीचे व्हावे यासाठी जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, सोलापूर व प्रकल्प प्रमुख, सृजन ऑरगॅनिक कमोडिटीज प्रा. लि., सोलापूर यांचे संयुक्त खाते बँकेत उघडण्यात यावे. या संयुक्त खात्यामध्ये संस्थेच्या हिश्याची रक्कम ज्या प्रमाणात उपलब्ध होईल, त्याच प्रमाणात या प्रकल्पांतर्गत मंजूर असलेला निधी संबंधित संस्थेस अदा करण्यात यावा.

१०. प्रादेशिक सह आयुक्त पशुसंवर्धन, पुणे सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी योजनेसाठी संनियंत्रण अधिकारी असल्यामुळे त्याची मान्यता प्राप्त करुन घेतल्यानंतरच जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, सोलापूर यांनी रक्कम बँकेतून आहरीत करुन संबंधित संस्थेला वितरीत करावी.

११. या प्रकल्पांतर्गत मंजूर करण्यात आलेल्या निधीचा विनियोग योग्यरीत्या न झाल्यास तो शासकीय नियमानुसार व बंधपत्रातील अटी व तरतुदीनुसार व्याजासहीत संबंधित संस्थेकडून वसूल करण्यात येईल.

१२. सदर प्रकल्पांतर्गत खरेदी करण्यात येणारे सर्व साहीत्य व उभारण्यात येणा-या प्रकल्पासाठी संस्थेने शासन कार्यपध्दतीप्रमाणे ई-निविदा प्रक्रीयेचा अवलंब करावा.

१३. या प्रकल्पांतर्गत बसविण्यात येणा-या साहित्यांवर तसेच योजनेअंतर्गत उभारण्यात येणा-या प्रकल्पावर हा प्रकल्प **"राष्ट्रिय कृषि विकास योजने अंतर्गत"** असे ठळकपणे दर्शनी भागावर नमूद करणे आवश्यक राहील.

१४. संस्थेने सादर केलेल्या प्रकल्प अहवालानुसार प्रकल्प पूर्णत्वास नेण्याची जबाबदारी खालीलप्रमाणे गठीत करण्यात आलेल्या **"प्रकल्प अंमलबजावणी समिती**ची" राहील.

१. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, सोलापूर --**अध्यक्ष**
२. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जि.प.,सोलापूर --**सदस्य**
३. सहा.आयुक्त पशुसंवर्धन, लघु पशुसर्वचिकीत्सालय,माळशिरस --**सदस्य**
४. संबंधित संस्थेचे व्यवस्थापकीय संचालक -- **सदस्य**
५. सहाय्यक आयुक्त, जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त कार्यालय सोलापुर -**सदस्य सचिव**

१५. हा प्रकल्प राबवून झाल्यानंतर आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी प्रकल्पाची फलनिष्पत्ती त्यांच्या अभिप्रायासह शासनास सादर करावी. तसेच, सदरचा प्रकल्प राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या दिनांक १८.०७.२०१९ रोजीच्या बैठकीतील निर्णय व राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सुचना तसेच, केंद्र शासनाने राष्ट्रीय पशुधन अभियानाच्या अंमलबजावणीकरीता निर्गमीत केलेल्या मार्गदर्शक सुचना विचारात घेऊन राबविण्यात यावा.

१६. या प्रकल्पाचा समावेश संबंधित जिल्हयाच्या जिल्हा कृषि आराखडयात (C-DAP) करण्यात येवून, राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष व पदुम-३ कार्यासनास कळविण्यात यावे. तसेच केंद्र शासनाने विकसित केलेल्या RDMIS या प्रणालीवर या प्रकल्पाची माहिती भरण्यात यावी.

१७. प्रकल्पाच्या आर्थिक खर्चाचा आणि भौतिक साध्याचा मासिक प्रगती अहवाल नियमितपणे शासनास सादर करावा.प्रकल्प राबविताना त्याची अंमलबजावणी, संनियंत्रण आणि मुल्यमापन करणे याबाबत आवश्यक तो समन्वय अंमलबजावणी यंत्रणांनी आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याशी ठेवावा.

१८. या प्रकल्पाच्या यशस्वी अंमलबजावणीकरीता आवश्यक त्या सविस्तर मार्गदर्शक सुचना आयुक्त पशुवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या स्तरावरुन संबंधितांना तात्काळ निर्गमीत कराव्यात. त्यामध्ये पशुधनाच्या मालकी हक्काचा तसेच संयंत्रांच्या मालकी हक्काचा स्पष्ट उल्लेख करण्यात यावा.

६. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१९१०२५११११८०९२९०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=406cb152e109154a7466c0050f88e5a437e17838973824687653a5e8d144b72b, ou=AGRI AND ADF DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2019.10.25 11:44:21 +05'30'

**( विकास तु. कदम )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति :-**

१. प्रधान सचिव, (पदुम), कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई-३२.

२. सचिव, (कृषि), कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई-३२.
३. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे-६७
४. आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, मध्यवर्ती इमारत, पुणे.
५. उपसचिव (राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), मुंबई / नागपूर
७. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन (सर्व)
८. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, सोलापूर
९. जिल्हा पशसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर
१०. सृजन ऑरगॅनिक कमोडिटीज प्रा. लि.,पुरंदवडे, सदाशिवनगर, ता.माळशिरस, जि.सोलापूर
११. निवड नस्ती पदुम-३.